**वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीच्या कामकाजासाठी सन २०२२-२३ या वर्षासाठी मेसर्स महा-आयटी यांना मुदतवाढ देण्याबाबत व संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभाल खर्चास निधी उपलब्ध करून देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२३ /प्र.क्र.७/ग्रा.सं.३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ६ जून, २०२४

वाचा - १) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. वैमाशा-२०२०/प्र.क्र.२६/ ग्रासं.३, दि.१७.०३.२०२०
२) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. वैमाशा-२०२२ / ५१/प्र.क्र.१५ ग्रासं-३, दि. २९ मार्च, २०२२
३) नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांचे पत्र क्र. वैमाशा-१४/ संगणकीकरण/२०२३/९७२, दि. ५ सप्टेंबर, २०२३
४) शासन निर्णय, वैमाशा-२०२३/प्र.क्र.७/ग्रा.सं.३ दि.२८ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अखत्यारित वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीचे काम महा-आयटी यांचेमार्फत करण्यात येत आहे. यासंदर्भात प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि. २ नोव्हेंबर,२०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये महा आयटी यांचेकडून सदर संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीच्या कामास दि. १ एप्रिल, २०२२ ते ३१ मार्च, २०२४ दरम्यानच्या मुदतवाढीस व त्याकरिताच्या एकूण रू. ४,१५,३९,७१५/- शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. यामध्ये सन २०२२-२३ या वर्षाचे रू. २,००,०३,०९५/- व सन २०२३-२४ या वर्षाचे रू. २,१५,३६,६५५/- इतक्या निधीचा समावेश आहे. सदर प्रकल्प समितीच्या मान्यतेच्या अनुषंगाने दि. २८.३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ व खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्यात आली आहे. मात्र सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित असलेला निधी प्रत्यक्ष खर्चासाठी उपलब्ध होऊ शकला नाही. आता चालू आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पित असलेल्या रू. २.८१ कोटी निधीतून महा-आयटी यांचे संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभाल शुल्क वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या संगणकीकरण प्रकल्पाच्या देखभालीच्या कामकाजासाठी संदर्भ क्र.४ अन्वये सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या वर्षासाठी मेसर्स महा-आयटी यांना मुदतवाढ दिलेली आहे. तसेच महा-आयटीने नियुक्त केलेल्या मनुष्यबळासाठी सन २०२२-२३ साठी रु. २,००,०३,०९५/- व सन २०२३-२४ साठी रु. २,१५,३६,६५५ /- इतक्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. सन २०२२-२३ या वर्षासाठी महा-आयटी यांना देय असलेल्या रक्कम रु. २,००,०३,०९५/- (अक्षरी रूपये दोन कोटी तीन हजार पंच्याण्णव मात्र) इतका निधी महा-आयटी यांना प्रदान करण्यास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून खर्च करण्यास सदर शासन निर्णयाद्वारे

मंजूरी देण्यात येत आहे. सन २०२३-२४ या वर्षासाठी महा-आयटी यांना देय असलेल्या रू. २,१५,३६,६५५ /- इतक्या निधी संदर्भात यथावकाश निर्णय घेण्यात येईल.

३. उपरोक्त खर्च मागणी क्र.एम-३, मुख्य लेखाशिर्ष ३४७५- इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा, १०६- वजने व मापे यांचे विनियमन, (००) (०१) वजने व मापे विनियमन- (नियंत्रक, उप नियंत्रक, वजने व मापे यांची कार्यालये) (३४७५००९३), १७- संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, प्रकल्प अंमलबजावणी समितीने दि. २ नोव्हेंबर, २०२३ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/, विनियम-भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग- तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७ (२) व यामध्ये शासन निर्णय दि.१९.१.२०१६ अन्वये नैसर्गिक वाढीतंर्गत प्रशासकीय विभागास दिलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०६०६१५३०४९४३०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.06.06 15:46:53 +05'30'

**( राजश्री रा. सारंग )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२.महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई.
३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५. नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
७.वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (ग्रा.सं.३)